**यशवंत पंचायत राज अभियान २००८-२००९**
राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषदा, पंचायत समित्या आणि ग्रामपंचायतींना पुरस्कार योजना.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
**शासन निर्णय क्रमांक : झेडपीए १००९/प्र.क्र.७६/पंरा-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक : ३० जुलै, २००९.**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक : झेडपीए १००८/प्र.क्र.१४८/पंरा-१, दिनांक ५ नोव्हेंबर, २००८.
२) शासन शुध्दीपत्र क्रमांक : झेडपीए १००८/प्र.क्र.१४८/पंरा-१, दिनांक २८ जानेवारी, २००९.
३) शासन निर्णय क्रमांक : झेडपीए १००८/प्र.क्र.१४८/पंरा-१, दिनांक २४ जुलै, २००९.
४) शासन निर्णय क्रमांक : बीजीटी १००९/प्र.क्र.९०/वित्त-१, दिनांक ३० जुलै, २००९.

**शासन निर्णय** :-

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायती राज संस्थांचे योगदान उल्लेखनीय आहे. राज्यामधील विकासाच्या सर्व योजना पंचायत राज संस्थांमार्फत राबविल्या जातात. त्यामुळे पंचायती राज संस्थांना त्यांनी केलेल्या कामानुसार त्यांना प्रोत्साहित करणे आवश्यक आहे. यासाठी राज्यातील पंचायत राज संस्थांचे प्रशासकीय व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या आणि ग्रामपंचायतींसाठी २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभागस्तर व राज्यस्तरावर अभिनव पुरस्कार योजना सुरु करण्यात आलेली आहे.

२. शासन निर्णय क्र. १ अन्वये यशवंत पंचायत राज अभियान २००९ या कार्यक्रमाच्या खर्चाचे नियंत्रण अधिकारी विभागीय आयुक्त, कोकण विभाग हे आहेत.

३. या वर्षीचा यशवंत पंचायत राज अभियान हा कार्यक्रम दिनांक ८ ऑगस्ट, २००९ रोजी होणार आहे. सदर कार्यक्रमाच्या आयोजनाचा खर्च भागविण्यासाठी रु.२,९१,००,०००/- (रुपये दोन कोटी एक्क्याण्णव लक्ष फक्त) एवढ्या रकमेस या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदरचा खर्च " मागणी क्र.एल-३, २५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१-पंचायती राज, ३१-सहाय्यक अनुदाने (०१) (०४) विशेष कार्यक्रम व ग्राम अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यामध्ये उत्कृष्ट काम केल्याबद्दल जिल्हा परिषदांना व पंचायत समित्यांना प्रोत्साहनपर अनुदाने

(२५१५ ००६२) (योजनेतर) (दत्तमत) " या लेखाशीर्षाखाली सन २००९-१० च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. **वरील रक्कम आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. सदर रकमेच्या मर्यादेत राहूनच खर्च करावा. जादा खर्च करू नये.**

५. उपरोक्त शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक निरंक, दिनांक २९ जुलै, २००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२००९०७३०१७४७०३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ. प्रशांत रसाळ ) ३०/७/९

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२. अप्पर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर.
५. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग, अर्थ-३ व अर्थ-१७, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग, व्यय-१५, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-४, वित्त-७, वित्त-८, पंरा-९, समन्वय कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती, कार्यासन क्र. पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.